तत्कालीन मुंबई सरकार, मुंबई महानगरपालिका व श्री.वाडीया यांच्यामध्ये १९२६ साली झालेल्या ट्रस्ट डिडची तपासणी करण्यासाठी समिती गठित करण्याबाबत

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः अनुदान-२०१७/प्र.क्र.२६७/राकावि-२

गोकूळदास तेजपाल रुग्णालय आवार, १० वा मजला
मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक : १६ जुन, २०१७.

**प्रस्तावना -**

तत्कालीन मुंबई सरकार, मुंबई महानगरपालिका व श्री.वाडीया यांच्यामध्ये दिनांक२७.०७.१९२६ रोजी यांच्यामध्ये ट्रस्ट डिड करार करण्यात आलेला आहे. सदर करारनाम्यानुसार रुग्णालयाच्या एकूण आर्थिक भारापैकी जवळपास ५० टक्के आर्थिक भाराची जबाबदारी राज्य शासनावर आहे. सार्वजनिक आरोग्य विभागाला प्राप्त होणारी अपूरी अर्थसंकल्पिय तरतूद, विभागाचा वाढता खर्च, राज्य शासनाचे मर्यादित उत्पन्न स्त्रोत लक्षात घेता, तसेच, रुग्णालय मुंबईत असल्याने आणि मुंबईतील आरोग्य सेवा हि संपूर्णत: महानगर पालिकेची जबाबदारी असल्याचे लक्षात घेता, सदर करारनाम्याचा याबदलत्या परिस्थितीत सर्वंकष आढावा घेण्याकरीता समिती नियुक्त करण्याची आवश्यकता होती.

**शासन निर्णय-**

वरील वस्तुस्थितीच्या अनुषंगाने सन १९२६ मध्ये तत्कालीन मुंबई सरकार, मुंबई महानगरपालिका व श्री.वाडीया यांच्यामध्ये झालेल्या कराराचा सर्वंकष आढावा घेण्यासाठी पुढीलप्रमाणे समिती स्थापन करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| १) अप्पर मुख्य सचिव (आरोग्य व कुटुंब कल्याण) सा.आ.विभाग | : समिती अध्यक्ष |
| २) अप्पर मुख्य सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय | : सदस्य |
| ३) आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका | : सदस्य |
| ४) आयुक्त, आरोग्य सेवा, मुंबई | : सदस्य |
| ५) सह सचिव/ उप सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय | : सदस्य |
| ६) उप सचिव (राकावि-२), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय | : सदस्य |
| ७) मुख्य कार्यकारी अधिकारी, नौरोसजी वाडीया मॅटर्निटी हॉस्पिटल | : सदस्य |
| ८) उप संचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे | : सदस्य सचिव |

२. सदर समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील :-

१) नौरोसजी वाडीया मॅटर्निटी हॉस्पिटल सुरु करणे व चालविणेबाबत दि.२७.६.१९२६ रोजी महानगरपालिका आणि नौरोसजी वाडिया ट्रस्ट यांच्यात झालेल्या करारनाम्याचा आढावा घेऊन राज्यशासनास यापुढे आर्थिक दायित्वातुन मुक्त करण्यासाठी उपाययोजना सुचविणे.

२) सदर रुग्णालयाची स्थापना झाली तेव्हापासून आजपर्यंत सदर रुग्णालय चालविण्याकरीता जो खर्च झाला आहे/होत आहे. त्यामध्ये सदर त्रिपक्षीय करारातील तिन्ही पक्षाची नेमकी आर्थिक (जमिनीसह) Involvement तपासणे व तपशील स्पष्ट करणे.

३) रुग्णालयाच्या उत्पनाचे अन्य स्त्रोत (करारातील तिन्ही पक्षांनी उपलब्ध केलेल्या (cash व kind मधील निधी व्यतिरिक्त ) व त्यातुन वर्षनिहाय उत्पन्न (कोणत्याही स्वरुपातील व डोनेशन्स सह) तपासणे व तपशील स्पष्ट करणे.

४) करारात उल्लेख असलेल्या Endowment Fund व Common Fund मधील जमेचा व व्ययाचा तपशील तपासणे व स्पष्ट करणे.

५) मोफत व सशुल्क रुग्णसेवेचे प्रमाण तपासणे व तपशील वर्षनिहाय व वर्गवारीनुसार स्पष्ट करणे.

सदर समितीने उपरोक्त मुद्दयांबाबत छाननी करुन आपला अंतिम अहवाल ६ महिन्याच्या कालावधीत सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६२७१२४२०६३११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay R More

Digitally signed by Sanjay R More
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7256abb8dd472637941e581488fb02eda9e0d6b701c434bcf471a0d525f80681, cn=Sanjay R More
Date: 2017.06.27 14:34:25 +05'30'

**संजय रा.मोरे**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मंत्री (सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण) , महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मंत्री (वित्त ), महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
३. अ.मु.स.,(आरोग्य व कुटुंब कल्याण), सा.आ.विभाग, मंत्रालय, मुंबई.

४. अ.मु.स (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्र.स.(वि.सू.) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (विधी व न्याय विभाग), मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
८. आयुक्त, आरोग्य सेवा, मुंबई.
९. उप सचिव (व्यय-१३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.उप सचिव (राकावि-२), सावजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.सह सचिव/ उप सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.संचालक, आरोग्य सेवा संचलनालय, मुंबई.
१३.उपसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे.
१४.अध्यक्ष, नौरोसजी वाडीया मॅटर्निटी हॉस्पिटल, परळ, मुंबई.
१५.मुख्य कार्यकारी अधिकारी, नौरोसजी वाडीया मॅटर्निटी हॉस्पिटल, परळ, मुंबई.
१६.निवड नस्ती. (राकावि-२), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.